**<u>पदस्थापनेतील बदल</u>**
**उप अभियंता (स्थापत्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०२१/ प्र.क्र.६१/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ११.११.२०२१

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील ४(४) व४(५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, श्रीमती विनीता सं.करवीर यांना शासन आदेश क्र.पीओजी २०२०/प्र.क्र.३६ /सेवा-२, दिनांक १९.६.२०२० अन्वये उप अभियंता, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कार्यालय,पुणे येथे देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये त्यांच्या विनंतीनुसार बदल करण्यात येऊन त्यांची पदस्थापना उप कार्यकारी अभियंता, मार्ग प्रकल्प विभाग, सांगली या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती विनीता सं.करवीर, उप अभियंता (स्थापत्य) यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्रीमती विनीता सं.करवीर, उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती करवीर, उप अभियंता(स्थापत्य) यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११११७११२७९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2021.11.11 17:33:27 +05'30'

**(स्वा.स.पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
३. श्रीमती विनीता सं.करवीर, उप अभियंता(स्थापत्य) यांना संबंधित मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे यांच्यामार्फत.
४. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६. मा.मंत्री(सा.बां.)(सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा.मंत्री,सा.बां.(सार्वजनिक उपक्रम) / मा.राज्यमंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा.राज्यमंत्री,सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते) /सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन सेवा-३/आस्था-१/आस्था-३, सा.बां.वि., मंत्रालय,मुंबई
९. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.